**संत गाडगेबाबा निर्वाणभूमी वलगांव, ता.जि.अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी विकास आराखडा**
**निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः : तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.७७/का.१४४४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २६ मे, २०१७.

**वाचा-**

१) शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.७७/का.१४४४, दिनांक २२ ऑक्टोबर, २०१२.
२) शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.६२/का.१४४४, दिनांक ९ मार्च, २०१६.
३) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र. नियोजन/वविआ/निवि/सांस/३०५/२०१६, दिनांक २७ एप्रिल,२०१६.

**प्रस्तावना :**

संत गाडगेबाबा निर्वाणभूमी वलगांव, ता.जि.अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी शासन निर्णय, दिनांक २२ ऑक्टोबर, २०१२ अन्वये ₹३७.८७ कोटीच्या विकास आराखड्यास मान्यता देण्यात आलेली असून, सदर कामांसाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांना सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

संत गाडगेबाबा निर्वाणभूमी वलगांव, ता.जि.अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठीच्या आराखड्यातील कामांसाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांना ₹५,४२,४० हजार निधी वितरित करण्यात येत आहे. या निधीचे उद्दिष्टनिहाय वाटप खालीलप्रमाणे आहे:-

(रुपये हजारात)

| उद्दिष्ट निहाय बाबी | वितरीत निधी |
|---|---|
| ५३, मोठी बांधकामे | ५,४२,४० |
| **एकूण** | **५,४२,४०** |

सदरहू खर्च लेखाशिर्ष "मागणी क्रमांक ओ-८, ३४५२- पर्यटन, ०१- पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे, (००)(०७) संत गाडगेबाबा निर्वाणभूमी वलगांव, ता.व जि.अमरावती, पर्यटन स्थळ विकास आराखडा (३४५२ २८८३) योजनांतर्गत योजना (दत्तमत)" याखाली खर्ची टाकण्यात यावा.

मात्र हा निधी स्वीय प्रपंजी खात्यात ठेवता येणार नाही.

वर नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा दरमहा ताळमेळ घालण्यात यावा. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल,२०१७ मध्ये नमुद अटींच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२६१२१४४९७०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Prashant Sarjerao Hadambar
Date: 2017.05.26 12:16:39 +05'30'

**( प्रशांत हाडंबर )**

कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र -१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. विभागीय आयुक्त,अमरावती विभाग, अमरावती .
४. वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई.
५. जिल्हाधिकारी, अमरावती.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती .
७. नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती, का.१४४४, नियोजन विभाग, मुंबई.

------------